**महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ मधील अधिक्षक कृषि अधिकारी संवर्गातील पदावर तदर्थ ( Ad hoc ) पदोन्नतीने नेमणूका**

**महाराष्ट्र शासन**

कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग.

शासन निर्णय क्रमांक- आकृवि १२१० /प्र.क्र.२७६/१५अे

मंत्रालय विस्तार,मुंबई-४०० ०३२

दिनांक - ३० जून,२०११.

**वाचा** :- १) सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्रमांक बीसीसी २००९/प्र.क्र.२९१/०९/१६ब, दि.५/११/२००९.

२) शासन अधिसुचना सामान्य प्रशासन विभाग क्रमांक एसआरव्ही २०१०/प्र.क्र .१/१०/१२, दि.८.६.२०१०.व दि. २१.६.२०१०.

३) कृषि विभागातील महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ संवर्गातून अधिक्षक कृषि अधिकारी संवर्गातील पदे पदोन्नतीने भरण्यासाठीच्या विभागीय पदोन्नती समितीची दि.१७.८.२०१० ची बैठक.

**<u>शासन निर्णय</u> :-**

खाली नमुद केलेल्या महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ मधील रु.१५६००-३९१००+ ग्रेड पे ५४०० या वेतनश्रेणीतील अधिकाऱ्यांना **अधिक्षक कृषि अधिकारी** या संवर्गातील रु.१५६००-३९१००+ ग्रेड पे ६६०० या वेतनश्रेणीतील त्यांच्या नावासमोर नमूद केलेल्या पदावर ते ज्या दिवशी त्या पदाचा प्रत्यक्ष कार्यभार ग्रहण करतील त्या दिनांकापासून ११ महिन्यांसाठी किंवा शासनाचे पुढील आदेश होईपर्यंत यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यन्त तदर्थ ( **Ad hoc** ) पदोन्नती व पदोन्नतीने पदस्थापना देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | प्रवर्ग | पदोन्नतीने वाटप करावयाचा महसुल विभागीय संवर्ग | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.जे.पी.शिंदे, कृषि उप संचालक, रोहयो, कृषि आयुक्तालय, पुणे | खुला | पुणे | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, सांगली ( श्री.बिराजदार यांच्या बदलीने रिक्त होणा-या पदी पदस्थापित श्री.बिराजदार यांची अन्य पदी पदस्थापना करण्याचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.) |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| २ | श्री.पी.बी.पवार, खाजगी सचिव तथा जनसंपर्क अधिकारी, मा.विधानसभा उपाध्यक्ष यांचे कार्यालय, विधानभवन, मुंबई (प्रतिनियुक्तीच्या पदावर) | खुला | पुणे | प्रकल्प व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य, फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे ( प्रतिनियुक्तीने ) |
| ३ | श्री.आर.बी.चळवदे, कृषि विकास अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापूर | खुला | नागपूर | अधिक्षक कृषि अधिकारी, विभागीय कृषि सह संचालक, नागपूर या रिक्त पदावर |
| ४ | श्री.एम.एल.चपळे, कृषि उप संचालक, जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, लातूर | खुला | पुणे | प्रकल्प व्यवस्थापक, महाराष्ट्र राज्य, फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे (प्रतिनियुक्तीने) |
| ५ | श्री.बी.एस.ब-हाटे, महाराष्ट्र कृषि सेवा गट-अ | खुला | नागपूर | जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी, वर्धा या रिक्त पदावर |

२. खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून सदर पदोन्नती देण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

i) उपरोक्त अधिका-यांची तदर्थ ( **Ad hoc** ) पदोन्नती ही ११ महिन्यांसाठी किंवा शासनाचे पुढील आदेश होईपर्यन्त यापैकी जे अगोदर घडेल तोपर्यन्त चालू राहिल व या कालावधीनंतर सदर पदोन्नती आदेश आपोआप संपुष्टात येतील.

ii) उपरोक्त अधिका-यांची पदोन्नती तदर्थ ( **Ad hoc** ) असल्याकारणाने त्यांना सदरच्या पदोन्नतीच्या दिनांकापासून सेवा जेष्ठतेसाठी हक्क सांगता येणार नाही. ज्यावेळी अशा अधिका-यांच्या पदोन्नत्या नियमित होतील, तेव्हापासून त्यांची जेष्ठता निर्धारित करण्यात येईल.

iii) कोणत्याही अधिका-यास कोणत्याही कारणास्तव मानीव दिनांक मिळाल्यामुळे अथवा आरक्षणामुळे सेवा जेष्ठतेत अथवा निवड सूचीत बदल झाल्यास कनिष्ठतम अधिका-यास कोणतीही पूर्व सूचना न देता पूर्व संवर्गात पदावनत करण्यात येईल.

iv) यापैकी ज्या अधिकाऱ्यांविरुद्ध कोणतीही विभागीय चौकशी अथवा शिस्त भंगाची कार्यवाही सुरु अथवा प्रस्तावित असल्यास त्याच्या अधीन राहून सदर पदोन्नत्या असतील.

v) सदर अधिकाऱ्यांना पदोन्नती शासकीय कर्मचारी / अधिका-यांना वयाच्या ५०/५५ वर्षापलीकडे सेवेत ठेवण्याबाबतच्या पुनर्विलोकनाच्या कार्यवाहीच्या अधीन राहील.

vi) सदर अधिकाऱ्यांची पदोन्नती मा.मुंबई उच्च न्यायालयाच्या मूळ याचिका क्र.८४५२/२००४ वरील तसेच इतर संबंधित न्यायालयातील निर्णय यांच्या अधीन राहील.

३.	प्रतिनियुक्तीने पदस्थापना दिलेल्या अ.क्र.२ व अ.क्र.४ वरील अधिका-यांचे प्रतिनियुक्तीचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील

सदर अधिकाऱ्यांनी त्यांचा सद्याचा पदभार निकटतम कनिष्ठ अधिकाऱ्यांकडे सोपवून तात्काळ पदोन्नतीच्या पदावर रुजू व्हावे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

sdhakane

**( संदिप ढाकणे )**
**कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन,**

प्रति,

आयुक्त ( कृषि ), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
व्यवस्थापकिय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सोलापुर
विभागीय कृषि सहसंचालक, नागपूर, पुणे, लातूर,कोल्हापुर
जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी , लातूर,अहमदनगर
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) / लेखा परिक्षा ) १/२, महाराष्ट्र, मुंबई / नागपूर
संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी ( द्वारा कृषि आयुक्तालय, पुणे )
संबंधित अधिकारी ( द्वारा कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे )
निवड नस्ती (१५अे)

**प्रतिलिपी,**

मा.मंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
मा.राज्यमंत्री (कृषि) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
स्वीय सहायक, प्रधान सचिव (कृषि)